केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमांतर्गत सर्वसाधारण योजनेतून कोविड-१९ साठी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून २२१०F१५७ या लेखाशिर्षातून ६०% केंद्र हिश्श्यातील रू. २८७२७.०० लक्ष व २२१०५२४६ या लेखाशिर्षातून ४०% राज्य हिश्श्यातील रु.१९१५१.३३ लक्ष अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बियुडी -१३२१/प्र.क्र.१४/२१/आरोग्य-७**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २१ ऑक्टोबर, २०२१

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जुन, २०२१.
२) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/ एफएमजी/ कें.रा.हि./५०८८२-९०/२०२१-२२, दिनांक ०१.०९.२०२१ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

ग्रामिण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी,कार्यक्षम,उत्तरायी आणि विश्वासार्ह आरोग्य सेवा उपलब्ध करून देण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल, २००५ पासून राष्ट्रीय ग्रामिण आरोग्य अभियान सुरू केले आहे. सदर योजनेअंतर्गत प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम (Reproductive child Health), नियमित लसीकरण, मिशन फ्लेक्सीपुल, पायाभूत सुविधांचे बळकटीकरण व पल्स पोलियो लसीकरण इत्यादी आरोग्य सेवा देण्यात येतात. त्या अनुषंगाने राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमा करीता सर्वसाधारण (General) वर्गवारीतून कोविड-१९ साठी ६०% केंद्र व ४०% राज्य हिश्श्याचे अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. प्रस्तुत प्रकरणी आता पर्यंत वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

(रुपये लाखात)

| अ. क्र. | शासन निर्णय क्रमांक व दिनांक | सन २०२१-२२ ची अर्थसंकल्पीय + पुरक मागणीद्वारे तरतूद (६०% केंद्र हिस्सा) | वितरीत केंद्र हिस्सा | सन २०२१-२२ ची अर्थसंकल्पीय + पुरक मागणीद्वारे तरतूद (४०% राज्य हिस्सा) | वितरीत राज्य हिस्सा |
|---|---|---|---|---|---|
| १ | कोविड-१९ सन २०२१-२२ शा.नि.क्र.बीयुडी १३२०/प्र.क्र.१४/ आ-७ दि. २८.०४.२०२१ | २३७४७०.२६ | १९९००.०० | १२००००.०० | -- |
| २ | कोविड-१९ सन २०२१-२२ क्र. बीयुडी १३२१ / प्र.क्र. १०/भाग-१/ आरोग्य-७ दि. २९.०४.२०२१ | | १९४००.०० | | -- |
| ३ | शा.नि.क्र.बीयुडी १३२१/प्र.क्र.२२/२१/ आ-७ दि. २४.०६.२०२१ | | ४५०२.०० | | ३००१.३३ |
| ४ | कोविड-१९ सन २०२१-२२ क्र. बीयुडी १३२१ / प्र.क्र. १०/भाग-१/ आरोग्य-७ दि. ०८.०७.२०२१ | | ३०.०० | | -- |
| ५ | शा.नि.क्र.बीयुडी १३२१/प्र.क्र.२६/२१/ आ-७ दि. १३.०७.२०२१ | | -- | | १०३५५.९२ |
| ६ | लसीकरणासाठी - क्र. बीयुडी १३२१ / प्र.क्र. १०/भाग-१/ आरोग्य-७ दि. १३.०७.२०२१ | | १४२३.८३७१२ | | -- |
| ७ | कोविड-१९ सन २०२१-२२ शा.नि.क्र.बीयुडी १३२०/प्र.क्र.१४/ आ-७ दि. १५.०९.२०२१ | | १२३१२.०० | | ८२०८.०० |
| B | **एकूण वितरीत अनुदान :- (१+२+३+४+५+६+७)** | | **५७५६७.८३७१२** | | **२१५६५.२५** |
| C | **वितरणासाठी उपलब्ध तरतूद** | | **१७९९०२.४२२८८** | | **९८४३४.७५** |

**<u>शासन निर्णय :-</u>**

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमाकरीता सर्वसाधारण वर्गवारीतून (General) कोविड-१९ साठी ६०% केंद्र व ४०% राज्य हिस्सा वितरीत करण्यास वित्त विभागाने मंजूरी प्रदान केली आहे. सदरचा केंद्र व राज्य हिस्सा वितरीत करण्याकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीय तरतूद व पुरक मागणीद्वारे केंद्र हिस्सा लेखाशिर्ष

२२१०F१५७ खाली रु. २३७४७०.२६ लक्ष व राज्य हिस्सा लेखाशिर्ष २२१०५२४६ करीता रु. १२००००.०० लक्ष एवढी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सबब, सदर तरतुदीतून ६०% केंद्र हिश्श्यापोटी रू. २८७२७.०० लक्ष व ४०% राज्य हिश्श्यापोटी रु. १९१५१.३३ लक्ष इतकी रक्कम राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२१-२२ साठी मंजूर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ. क्र. | तपशिल | (रु.लाखात) | | |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | सन २०२१-२२ ची अर्थसंकल्पीय + पुरक मागणीद्वारे तरतूद | मागणी रक्कम (केंद्र ६०% ) (राज्य ४०%) |
| १ | आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; ८००- इतर खर्च; सर्वसाधारण योजना (०१)(१८) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान केंद्र पुरस्कृत योजना (६० टक्के केंद्र हिस्सा) कार्यक्रम, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०F१५७ | २३७४७०.२६ | २८७२७.०० |
| २ | आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; ८००- इतर खर्च; सर्वसाधारण योजना (०१)(१५) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान केंद्र | २२१०५२४६ | १२००००.०० | १९१५१.३३ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | पुरस्कृत योजना (४० टक्के राज्य हिस्सा) कार्यक्रम, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | | | |

४. वित्त विभागाच्या दिनांक २४ जुन, २०२१ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक २४ जुन, २०२१ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २४ जुन, २०२१ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तींचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

५. सदर अनुदान सशर्त असून वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

६. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४६७/२०२१/व्यय-१३, दिनांक ०४.१०.२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१२१३२९२२५११७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SOMNATH VASANT POTARE

Digitally signed by SOMNATH VASANT POTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=4d677dcd1bc3bed55a48ddbdaad925a6651c5d43a12d84cf305d3ff791ea7f16, pseudonym=2F7DD6849F376E58DE2CF34A8700B81E11CB58E0, serialNumber=17E9C3C1EF20B007FEFC5A1F1EC0E69F061648D4F897D5822E9F0E56899502E0,
cn=SOMNATH VASANT POTARE
Date: 2021.10.21 11:49:25 +05'30'

**( सोमनाथ पोटरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कु.क. कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग ( अर्थसंकल्प/व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग
११.निवडनस्ती ( आरोग्य -७) .